[illegible] महानगरपालिका
श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशिय सामाजिक संस्था,धुळे यांना मंजूर अभिन्यासातील खुल्या जागेचे वाटप करण्याबाबत केलेला महानगरपालिका महासभा ठराव क्र.३८, दिनांक ९.३.२००७ निलंबित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :-धुमपा १५०९/७८६/प्रक्र. १७८/०९/नवि-२५
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक:- १६ नोव्हेंबर, २००९

वाचा :- १) धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.३८, दिनांक ९.३.२००७
२) आयुक्त,धुळे मनपा यांचे जा.क्र. धुमपा/नर/१०१३/०९-१०,दि.१३.११.२००९ अन्वये शासनास सादर केलेला अहवाल
३) आयुक्त,धुळे मनपा यांनी जा.क्र. धुमपा/नर/अपील/क्यू,दि.१६.११.२००९ अन्वये शासनास सादर केलेला अहवाल

प्रस्तावना:- धुळे महानगरपालिकेस महानगरपालिका हद्दीतील स.नं.३९७ मधील फायनल प्लॉट नं.३९ येथील ३०४५० चौ.फूट खुले क्षेत्र प्राप्त झालेले असून या जागेचा ताबा महानगरपालिकेने घेतलेला आहे. या प्राप्त झालेल्या जागेचे वाटप श्री समर्थ औजिनाथबाबा सामाजिक बहुउद्देशिय संस्था,धुळे यांना बाल संस्कार केंद्र, उद्यान व सार्वजनिक वाचनालय या प्रयोजनार्थ करण्याबाबत महानगरपालिकेने ठराव क्र.३८, दि.९.३.२००७ रोजी मंजूर केलेला आहे. या ठरावानुसार संस्थेस ३०४५० चौ.फूट जागा रु.५०००/- प्रति वर्ष या नाममात्र दराने ३० वर्षासाठी भाडेपट्टयावर देण्याबाबत करारनामा दि.२४.१२.२००७ रोजी करण्यात आलेला आहे.

श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे या संस्थेस जागेचे करण्यात आलेले वितरण हे शासनाच्या दि.१० जून १९९६ च्या तरतूदींशी विसंगत असून स्थानिक भूखंडधारकाचे प्रतिनिधीत्व करणारी कै.बाळासाहेब वाखारकर स्मृती विश्वस्थ संस्था,धुळे यांनी या जागेची मागणी वेळोवेळी यापूर्वी केलेली असतानाही त्यांच्या मागणीची दखल न घेता नियमबाहय पध्दतीने श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे यांना जागेचे वाटप केल्याबाबत कै.बाळासाहेब वाखारकर स्मृती विश्वस्थ संस्था यांनी मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपिठात याचिका क्र. ११२८/२००९ दाखल केली.

मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.५७४६/२००९ मध्ये दि.१६.९.२००९ रोजी दिलेल्या आदेशात असे नमूद केले आहे की, याचिकाकर्ता संस्थेने दाखल केलेली रिट याचिका

क्र.११२८/२००९ मागे घेतल्यामुळे सदरहू याचिका निकाली निघाली आहे. मा.उच्च न्यायालयाने दि.१८.२.२००९ पासून तीन आठवड्याच्या कालावधीसाठी जमिनीची स्थिती "जैसे थे" ठेवण्याबाबत दिलेले आदेश संपुष्टात आलेले आहेत. अर्जदार संस्थेचे शासनाकडील अपील निकाली निघेपर्यन्त स्थगिती कायम ठेवण्याबाबत मा.उच्च न्यायालय आदेश देवू शकत नसल्याने अर्जदार संस्थेने शासनाकडे दि.१३.७.२००९ रोजी केलेल्या अर्जावर शासनाने गुणवत्तेनुसार दोन महिन्याच्या आत निर्णय घ्यावा.

श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे या संस्थेस जागेचे करण्यात आलेले वितरण हे शासनाच्या ज्ञापन क्रमांक टिपीबी/४३९६/११४/प्र.क्र.८९/९६/नवि-११,दि.१० जून १९९६ च्या तरतूदींशी विसंगत असून स्थानिक भूखंडधारकाचे प्रतिनिधीत्व करणारी कै.बाळासाहेब वाखारकर स्मृती विश्वस्थ संस्था,धुळे यांनी या जागेची मागणी वेळोवेळी यापूर्वी केलेली असतानाही त्यांच्या मागणीची दखल न घेता नियमबाहय पध्दतीने श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे यांनी जागेचे वाटप केल्याबाबत कै.बाळासाहेब वाखारकर स्मृती विश्वस्थ संस्था यांच्या तक्रारीचे सर्वसाधारण स्वरुप आहे.

मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.५७४६/२००९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार अर्जदार संस्थेने शासनाकडे केलेल्या अपिलातील मुद्दयांवर आयुक्त,धुळे मनपा यांच्याकडून अहवाल प्राप्त करुन घेण्यात आला असून,आयुक्त,धुळे मनपा यांनी शासनास सादर केलेल्या अहवालावरुन धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.३८,दि.९.३.२००७, हा खालील मुद्दयांवर मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम व शासनाच्या विद्यमान धोरणाशी विसंगत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

१) प्रस्तुत प्रकरणातील मंजूर अभिन्यासामधील खुल्या जागेचे क्षेत्र ३०४५० चौ.फूट एवढे असून या क्षेत्राच्या १०% क्षेत्र सार्वजनिक संस्थांना विकासासाठी देणे दि.१०.६.१९९६ च्या शासन ज्ञापनानुसार अनुज्ञेय आहे. तथापि श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे या संस्थेस खुल्या जागेचे संपूर्ण क्षेत्र वितरीत करण्याबाबत महानगरपालिकेने ठराव करुन या जागेचे वितरण केलेले आहे. सदरहू बाब शासनाच्या दि.१०.६.१९९६ च्या ज्ञापनाशी विसंगत आहे.

२) श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशीय सामाजिक संस्था,धुळे या संस्थेस ३०४५० चौ.फूट जागेचे वाटप रु. ५०००/- प्रतिवर्ष या नाममात्र दराने ३० वर्षाच्या भाडेपट्टा कराराद्वारे दिलेले आहे. महानगरपालिकेकडील जागेची विल्हेवाट अथवा हस्तांतरण याबाबत मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ७९ (ड) मधील तरतूदीनुसार महानगरपालिकेस चालू बाजारभावापेक्षा कमी दराने विक्री अथवा भाडेपट्टयाने देता येणार नाही. प्रस्तुत प्रकरणातील क्षेत्राचे सन २००७ मधील रेडीरेकनरनुसार चालू बाजारभावाने होणारे संभाव्य वार्षिक भाडयाचे मुल्य रु.२,९४,५००/- एवढे असल्याचे दिसून येते. महानगरपालिकेने श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशिय संस्थेस रु.५०००/- प्रतिवर्ष या दराने जागा भाडेपट्टयाने

दिलेली असल्याने महानगरपालिकेचा ठराव क्र.३८ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ७९ (ड) च्या तरतूदीशी विसंगत आहे.

३) शासनाच्या दि.१०.६.१९९६ च्या ज्ञापनानुसार महानगरपालिकेस हस्तांतरीत झालेली खुली जागा अभिन्यासातील भूखंड धारकांची गृहनिर्माण संस्था किंवा महानगरपालिका स्वत: विकसित करण्यास पात्र आहे. या व्यतिरिक्त अन्य संस्थेस ओपन स्पेसचा विकास करण्यासाठी वाटप/ भाडेतत्वावर देता येणार नाही. प्रस्तुत प्रकरणात श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशिय संस्था ही अभिन्यासातील भूखंडधारकांची नोंदणीकृत संस्था नसल्याने सदर शासन ज्ञापनाच्या (ब) मधील तरतूदीविरुध्द या जागेचे वाटप श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशिय संस्थेस झालेले आहे.

तक्रारदार श्रीमती कुसुमताई प्रभाकर वाखारकर यांनी कलम ४५१ खाली शासनाकडे केलेले अपील, या अपिलावर निर्णय घेण्याबाबत मा.उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठाने याचिका क्र. ५७४६/२००९ मध्ये दिलेले निर्देश व आयुक्त, धुळे मनपा यांनी शासनास सादर केलेला अहवाल विचारात घेता,धुळे महानगरपालिकेने पारित केलेला ठराव क्र.३८,दि.९.३.२००७ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील तरतुदींशी व शासनाच्या विद्यमान धोरणांशी विसंगत असल्याबाबतचे पूर्ववर्ती विवेचनावरुन स्पष्ट होत असल्याने सदरहू ठराव निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u> धुळे महानगरपालिकेस महानगरपालिका हद्दीतील स.नं.३९७ मधील फायनल प्लॉट नं. ३९ येथील ३०४५० चौ.फूट महानगरपालिकेच्या ताब्यातील खुले क्षेत्र श्री समर्थ औजिनाथबाबा सामाजिक बहुउद्देशिय संस्था यांना बाल संस्कार केंद्र, उद्यान व सार्वजनिक वाचनालय या प्रयोजनार्थ भाडेपट्टयाने देण्याबाबत महानगरपालिका महासभा ठराव क्र.३८,दि.९.३.२००७ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१(१) अन्वये निलंबित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( अ. बा. घरत )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२) महापौर,धुळे शहर महानगरपालिका, धुळे
३) आयुक्त ,धुळे शहर महानगरपालिका, धुळे (५ प्रती)
४) श्रीमती कुसुमताई प्रभाकर वाखारकर,अध्यक्षा, कै.बाळासाहेब स्मृती विश्वस्थ संस्था,धुळे,प्लॉट क्र.३४,प्रभाकर स्मृती, वाखारकर नगर,धुळे यांना आयुक्त,धुळे महानगरपालिका यांच्यामार्फत रवाना
५) श्री.किसनराव विठ्ठलराव भारस्कर, अध्यक्ष,श्री समर्थ औजिनाथबाबा बहुउद्देशिय सामाजिक संस्था, धुळे, रा.नाटेश्वर कॉलनी,धुळे यांना आयुक्त,धुळे महानगरपालिका यांच्यामार्फत रवाना
६) मा. सचिव ( नवि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई ३२
७) संगणक शाखा ,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दीकरिता)
८) निवडनस्ती - नवि-२५ (२ प्रती)